**१३२ के.व्ही. एकल परिपथ वाहिनी दुहेरी मनोऱ्यावर १३२ के.व्ही पाथ्री उपकेंद्रापासून सोलर पार्क उपकेंद्रापर्यंत उभारण्यासाठी विद्युत अधिनियम २००३ च्या कलम ६८ अन्वये शासनाची पूर्व परवानगी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - पावामा-२०२२/प्र.क्र.९९/ऊर्जा-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २५ जुलै, २०२३

संदर्भ : १) संचालक (प्रकल्प), महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित, मुंबई यांचे दिनांक ११.०४.२०२२ चे पत्र.
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. पावामो-**२०२१**/प्र.क्र.१७०/ ऊर्जा-४, दिनांक ०२.११.२०२२

प्रस्तावना :-

राज्यातील पारेषण वाहिन्यांचे सक्षमीकरण करुन राज्याला सुरळीत वीज पुरवठा होण्यासाठी संचालक (प्रकल्प), महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादित, मुंबई यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये शासनास परभणी जिल्ह्यातील बांदरवाडा, ता. पाथ्री येथील मे. रिन्यु पॉवर प्रा. लि. यांच्या ५० मे.वॅ. १३२ के.व्ही. निष्कासन व्यवस्था करण्याबाबतचे काम प्रस्तावित केले आहे. सदर प्रस्तावित वाहिनी १३२ के.व्ही. एकल परिपथ वाहिनी दुहेरी मनोऱ्यावर १३२ के.व्ही. पाथ्री उपकेंद्रापासून सोलर पार्क उपकेंद्रापर्यंत - ४ कि.मी. उभारणीचे काम प्रस्तावित केले असून सदर पारेषण वाहिनीच्या योजनेस विद्युत अधिनियम, २००३ अंतर्गतच्या कलम ६८ अन्वये पूर्वपरवानगी प्रदान करण्याची विनंती शासनास प्राप्त झाली आहे. सदर प्रस्तावास त्यानुषंगाने पूर्वपरवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

मे. रिन्यु पॉवर प्रा. लि. कंपनीकडून वाहिनी १३२ के.व्ही. एकल परिपथ वाहिनी दुहेरी मनोऱ्यावर १३२ के.व्ही. पाथ्री उपकेंद्रापासून सोलर पार्क उपकेंद्रापर्यंत - ४ कि.मी. उभारणीचे काम सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ प्रमाणे करण्यात येणार आहे.

परिशिष्ट - अ मध्ये नमूद केलेल्या नवीन पारेषण वाहिन्यांच्या / उपकेंद्राच्या उभारणीसाठी मे. रिन्यु पॉवर प्रा. लि. कंपनीस भारतीय विद्युत अधिनियम २००३ च्या कलम ६८ अंतर्गत खालील अटी तथा शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) परिशिष्ट - अ मधील वीज वाहिनीची उभारणी मे. रिन्यु पॉवर प्रा. लि. ही महापारेषण कंपनीच्या देखरेखेखाली करेल.
२) वीज वाहिन्यांचे संचलन व सुव्यवस्था मे. रिन्यु पॉवर प्रा. लि. कंपनी स्वत: करेल.
३) वीज वाहिन्यांचा वापर हे ज्या प्रयोजनार्थ करावयाचा ठरविलेला आहे केवळ त्याच प्रयोजनासाठी करणे मे. रिन्यु पॉवर प्रा. लि.यांना बंधनकारक असेल.

४) वीज वाहिन्या कार्यान्वीत करण्यापूर्वी/प्रभारीत करण्यापूर्वी याबाबतच्या सक्षम प्राधिकाऱ्यांकडून पूर्व परवानगी घेणे आवश्यक असेल.

५) वीज वाहिन्या उभारताना वा उभारल्यानंतर संबंधित जागा मालकांच्या/ शेतकऱ्यांच्या जर काही तक्रारी असतील तर त्या सक्षम प्राधिकाऱ्या समवेत विचार विनिमय करुन त्या तक्रारींचे यथायोग्यरित्या निराकरण करण्याची जबाबदारी मे. रिन्यु पॉवर प्रा. लि.यांची असेल.

६) सदरहू वीज वाहिनी उभारणे व उभारून ठेवणे, त्या अनुषंगाने आवश्यक असलेले सर्व परवाने मिळविणे, विहित केलेल्या निकषांची पूर्तता करणे तसेच शासनाचे विविध प्राधिकरण/विभाग/वीज नियामक आयोग इ. चे इतर प्रचलित नियम, त्याचप्रमाणे शासनाने वेळोवेळी मंजूर केलेले नियम व अटी मे. रिन्यु पॉवर प्रा. लि.कंपनीवर बंधनकारक राहतील.

७) विद्युत अधिनियम २००३ च्या कलम ६८ मधील अटी व शर्ती व त्यात वेळोवेळी होणारे बदल, या विभागाचा संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय क्रं. पावामो-२०२१/प्र.क्र.१७०/ऊर्जा-४, दिनांक ०२.११.२०२२ मधील अटी व शर्ती तसेच राज्य शासन व केंद्र शासनाची अशा पारेषण वाहिन्यांसंबंधीची वेळोवेळी जाहीर झालेली / होणारी मार्गदर्शक तत्वे व धोरणे सदरहू पारेषण वाहिन्यास लागू राहतील.

८) उक्त अटी व शर्तीचा भंग केल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आल्यास सदरहू मान्यता रद्द समजण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७२५१६१२१७९०१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN BHAGWAN SURVE

Digitally signed by NITIN BHAGWAN SURVE
DN: CN = NITIN BHAGWAN SURVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT
Date: 2023.07.25 16:13:51 +05'30'

**( नितीन सुर्वे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., प्रकाशगंगा, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

२) संचालक (प्रकल्प), महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., प्रकाशगंगा, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

३) सचिव, महाराष्ट्र वीज नियामक आयोग, १३ वा मजला, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, कुलाबा, मुंबई-४०० ००५.

४) मुख्य विद्युत वितरण अभियंता, २ रा मजला, विद्युत विभाग, मुख्य कार्यालय, पार्सल कार्यालय इमारत, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस, मुंबई-४०० ००१

५) निवडनस्ती (ऊर्जा-४)

# परिशिष्ट - अ

## महापारेषण कंपनीने त्यांच्या योजने अंतर्गत मंजूर केलेला प्रकल्प

| अ. क्र. | योजनेचा तपशील | योजने अंतर्गत असलेल्या वाहिनीचा तपशील | मान्यता क्र., दिनांक व योजनेची किंमत |
|---|---|---|---|
| १. | परभणी जिल्ह्यातील बांदरवाडा, ता. पाथ्री येथील मे. रिन्यु पॉवर प्रा. लि. यांच्या ५० मे.वॅ. १३२ के.व्ही. निष्कासन व्यवस्था करणेबाबत. | १३२ के.व्ही. एकल परिपथ वाहिनी दुहेरी मनोऱ्यावर पाथ्री उपकेंद्रापासून १३२ के.व्ही. सोलर पार्क उपकेंद्रापर्यंत उभारणे-४ कि.मी. | ठराव क्र. CMD/१०३५, दिनांक १६.१२.२०२१ रुपये ६२५.९४ लाख |

NITIN BHAGWAN SURVE

Digitally signed by NITIN BHAGWAN SURVE
DN: CN = NITIN BHAGWAN SURVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT
Date: 2023.07.25 16:14:12 +05'30'

(नितीन सुर्वे)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन